# भौतिकवाद हाच मुळात खोटा आहे !

डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग २
E Book 167

## डार्विनचा उत्क्रान्तिवादी सिद्धान्त खरा आहे काय ?- लेखमाला भाग २

प्राचार्य अद्वयानंद गळतगे,
४-५९११३८३ जि. बेळगाव कर्नाटक

### भौतिकवाद हाच मुळात खोटा

डार्विनचा उत्क्रांतिवाद ज्या भौतिकवादावर आधारलेला असल्यामुळे खोटा ठरतो, तो भौतिकवादच खोटा असल्यामुळे खोटा ठरत असल्यामुळे भौतिकवाद हाच मूळात खोटा का व कसा ठरतो, हे पाहणे अगत्याचे आहे. कारण त्यामुळे डार्विनच्या भौतिकवादी उत्क्रांतिवादाच्या खोटेपणावर अखेरचे शिक्कामोर्तब होते.

वस्तुतःभौतिकवादाचे मूळ खुद्द भौतिक विज्ञानातीलच क्वाँटम मेकॅनिक्सच्यामुळे उखडले गेले आहे ! तरीसुद्धा ज्याला विज्ञानाचा मुख्य प्रवाह म्हणतात त्या प्रवाहातील शास्त्रज्ञ अजूनही भौतिकवादीच आहेत; म्हणजे क्वाँटम मेकॅनिक्सचे चेतनाच्या बाजूने निघणारे तत्त्वज्ञानात्मक निष्कर्ष मान्य करायला तयार नाहीत, हे एक मोठेच आश्चर्य आहे. **त्यांना भौतविज्ञानातील सिद्धांताने भौतिकवादाच्या मर्यादा दाखवून दिलेल्या असताना सुद्धा त्या समजलेल्या नाहीत असाच याचा अर्थ होतो.** पण आपले हे अज्ञान आहे हे त्यांना मान्य नाही ! क्वाँटम मेकॅनिक्सवरच आपल्या या अज्ञानाचे खापर फोडून मोकळे होताना ते दिसतात ! म्हणजे क्वाँटम मेकॅनिक्सलाच ते दोष देतात. उदाहरणार्थ रिचर्ड फेनमन हा प्रसिद्ध भौतिकशास्त्रज्ञ म्हणतो, “माझ्या विचारानुसार मी असे सुरक्षितपणे विधान करू

शकतो की क्वाँटम मेकॅनिक्स कोणालाच समजत नाही.” ('I think I can safely say that nobody understands quantum mechanics.' **The Character of Physical Law** - R. Feynman 1965 P. 129)




आता जो क्वाँटम मेकॅनिक्सचा सिद्धांत प्रयोगाने सिद्ध झाला आहे, तो कोणत्याही शास्त्रज्ञाला समजत नसेल तर तो त्या क्वाँटम मेकॅनिक्सच्या सिद्धांताचा दोष आहे काय ? तथापि **क्वाँटम मेकॅनिक्सचा प्रयोग कोणत्याही शास्त्रज्ञाला समजत नसेल तर तो जादूचाच प्रयोग आहे असे ठरते ! कारण जादुच्या प्रयोगाची कारणमीमांसा भौतिक तत्त्वांच्या व नियमांच्या आधारे भौतशास्त्रज्ञांना करता येत नाही !** त्यामुळे त्या प्रयोगाने सिद्ध झालेला सिद्धांत भौतिकवादी शास्त्रज्ञांच्या दृष्टीला (बुद्धीला) समजत नाही ! **आणि जे बुद्धीला समजत नाही त्याला बाइक महटले पाहिजे आणि खरोखरच जे. ए. व्हीलर या भौतशास्त्रज्ञांनी क्वाँटम मेकॅनिक्सला प्रत्यक्षात जादूच जे बुद्धीला समजत नाही त्याला जादूच म्हटले पाहिजे !** आणि खरोखरच म्हटले आहे ! (**The Physicist's Conception of Nature ed. J. Mehra 1987 P. 203. Quantum Theory and Measurement** J. A. Wheeler and W. H. Zurek, 1983 P. 189) एकंदरीत क्वाँटम मेकॅनिक्सला दोष देण्याऐवजी जादूचा प्रयोग म्हणून त्याचा स्वीकार करणे चुकीचे नाही हा शहाणपणाचा दृष्टिकोन व्हीलरने स्वीकारलेला दिसतो. पण खरे कारण हे आहे की क्वाँटम सिद्धांताचा आधार घेतल्याखेरीज विश्वोत्पत्तीची उपपत्तीच शास्त्रज्ञांना देता येत नाही ! **अशा रीतीने न समजणारी विश्वोत्पत्ती न समजणाऱ्या क्वाँटम सिद्धांताच्या आधारे ते समजावून घेतात ! हा वदतोव्याघात आहे खरे. पण त्याला इलाज नाही. कारण हा सर्व मामला जादूचा आहे ! अशा रीतीने ऋग्वेदकालीन ऋषींपासून शंकराचार्य किंवा ब्लॅव्हेटस्कीपर्यंतच्या ब्रह्मविज्ञानवाद्यांनी ज्या जादूचा (मायेचा) विश्वोत्पत्तीसाठी आधार घेतला (ज्यामध्ये जीवाची उत्पत्ती व उत्क्रांती यांचाही समावेश होतो) त्याच जादूचा (मायेचा) आधार शेवटी भौतवैज्ञानिकांना क्वाँटम मेकॅनिक्सच्या रूपाने त्याच विश्वोत्पत्तीसाठी हल्ली घ्यावा लागला आहे.**

**विश्वोत्पत्ती आणि ईक्षण** (विचार वा संकल्प)**करणारा (observer)**

क्वाँटम मेकॅनिक्सच्या सिद्धांतानुसार भौतिक वस्तूचे अस्तित्व जाणीवेशिवाय (consciousness) सिद्ध होऊ शकत नाही. म्हणजेच **जाणिवेवर, चेतनावर भौतिक वस्तूचे अस्तित्व अवलंबून आहे. म्हणजेच चेतनाव्यतिरिक्त भौतिक वस्तूला स्वतंत्र अस्तित्व नाही.** विश्वोत्पत्तीच्या संदर्भात याचा अर्थ असा होतो की जाणीव वा चेतन हेच विश्वोत्पत्तीचे (जड वस्तूचे) मूळ कारण आहे. आधुनिक भौतविज्ञानानुसारं विश्वोत्पत्ती मूळ शून्यातून झाली आहे. ह्याला महास्फोट सिद्धांत (Big Bang Theory) म्हणतात. **पण विश्वोत्पत्ती शून्यातून महास्फोटाच्या रूपाने व्हावयाची झाल्यास क्वाँटम सिद्धांताचा आधार घ्यावा लागतो.** त्याखेरीज विश्वोत्पत्ती महास्फोटातून - शून्यातून होऊ शकत नाही; आणि **क्वाँटम सिद्धांत चेतनाशिवाय म्हणजेच ईक्षण करणाऱ्याशिवाय (observer) व्यावहारिक पातळीवर सिद्ध होऊ शकत नाही. परिणामी व्यावहारिक पातळीवर विश्वोत्पत्तीसाठी ईक्षण आवश्यक आहे** आणि आश्चर्य असे की विश्वोत्पत्ती ईक्षण करणाऱ्यापासून झाली असल्याचे उपनिषद ऋषींनी फार पूर्वीच सांगितले आहे. उदा. छांदोग्य उपनिषदात आरुणी ऋषी म्हणतो, 'तद् ऐक्षत बहुस्याम प्रजायेयेति । तत्ते जोऽ सृजत ।' (छा.उप. ६.२.३) म्हणजे त्याने (ब्रह्माने) ईक्षण केले (विचार वा संकल्प केला) की मी अनेक व्हावे. आणि त्याने (प्रथम) तेज निर्माण केले. हीच गोष्ट क्वाँटमतत्त्वामुळे (म्हणजे व्यावहारिकदृष्ट्या ईक्षण करणाऱ्यामुळे) महास्फोटातून - (radiation) निर्माण झाले, या शब्दात विश्वभौतशास्त्रज्ञ सांगतात. आता प्रश्न असा की हा क्वॉटम तत्त्वरूपी ईक्षण करणारा कोण ? (कारण ईक्षण करणाऱ्या शिवाय observer शिवाय क्वाँटम तत्त्वातून व्यावहारिक पातळीवर विश्व (तेज) (radiation) निर्माण होऊ शकत नाही) या प्रश्नाचे उत्तर मात्र भौतिकशास्त्रज्ञ देत नाहीत ! देऊ शकत नाहीत ! कां देऊ शकत नाहीत ? कारण वर सांगितलेच आहे. कारण क्वाँटमा सिद्धांत त्यांना समजत नाही !

अशा रीतीने **ईक्षण करणाऱ्यामुळे म्हणजे जाणिवेतून, चेतनातून भौतिक वस्तू (जडविश्व) निर्माण होते व उत्क्रांत होते.***[1] डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत म्हणतो

[1] * ईक्षण करणाऱ्याशिवाय विश्व निर्माण होते असा एक क्वाँटम सिद्धांताचा अर्थ काढणारा दृष्टिकोन काहींनी स्वीकारला आहे. पण या अर्थाच्या दृष्टिकोनानुसार अनेक (अनंत) समांतर विश्वे निर्माण होतात ! (Many Worlds Interpretation of Quantum Mechanics-Eds. DeWitt B. S. and Graham N. 1973) तसेच या अर्थानुसार ही विश्वे स्वतंत्र, म्हणजे परस्परांशी संपर्क नसलेली, मानावी लागतात. त्यामुळे त्यांचा खरेपणा तपासता येत नाही. परिणामी त्यांच्या

त्याप्रमाणे जडातून, जड विश्वातून चेतन (जीव, जाणीव) निर्माण व उत्क्रांत होत नाही. म्हणून ब्लॅव्हेटस्कीनी म्हटले आहे, "Darwin applies his system (of evolution) at the wrong end" (Isis unveiled | P. 429) म्हणजे डार्विन आपला उत्क्रांतिवादी सिद्धांत चुकीच्या बाजूने म्हणजे उलटी मांडतो. उलटी म्हणजे चेतनापासून जड निर्माण व उत्क्रांत होते. असे म्हणण्याऐवजी जडापासून चेतन (जीव व जाणीव) निर्माण व उत्क्रांत होते असे म्हणतो. पण जडापासून चेतन (जीव) निर्माण व उत्क्रांत होते असे मानले तर चेतन नष्ट होऊ शकते पण जड नष्ट होऊ शकत नाही, कारण ते अंतिम तत्त्व (सत्य) आहे, असे मानावे लागते. उदा. माणसाच्या मृत्यूनंतर त्याचा जीव (आत्मा) नष्ट होतो, पण शरीर भौतिक तत्त्वांच्या रूपाने नष्ट होत नाही, असे मानावे लागते ! याच्या उलट म्हणजे डार्विनच्या सिद्धांताविरुद्ध व क्वांटम सिद्धांतानुसार चेतनापासून (म्हणजे ईक्षणेमुळे) जड वस्तू (विश्व) निर्माण होते असे मानले तर जड विश्व नष्ट होऊ शकते. (परत शून्यात जाऊ शकते, कारण ते शून्यातूनच निर्माण झाले आहे.) पण चेतन (ईक्षण करणारा, जाणीव वा आत्मा) नष्ट होऊ शकत नाही असे मानावे लागते. या दोन पर्यायांमधील कोणते याचा निर्णय तात्त्विक पातळीवर क्वाँटम मेकॅनिक्सच्या सिद्धांत चेतनाच्या ईक्षण करणाऱ्याच्या बाजूने देतो आणि व्यावहारिकदृष्ट्या प्रत्यक्ष पुरावेही चेतनाच्या बाजूने व जडवादाच्या विरुद्धच आढळून येतात. ते पुरावे पाहणे म्हणूनच महत्त्वाचे व आवश्यक आहे. ते पुरावे पाहण्यापूर्वी जडवादी सिद्धांत प्रथम समजून घेतला पाहिजे.

---

अस्तित्वाविषयी प्रश्नचिन्ह निर्माण होते. तथापि हा दृष्टिकोन स्वीकारणाऱ्या फ्रेड ॲलन वुल्फ या शास्त्रज्ञाला शेवटी ही समांतर अनंत विश्वेसुद्धा चेतनाशिवाय म्हणजे ईक्षण करणाऱ्याशिवाय निर्माण होऊ शकत नसल्याचे मान्य करावे लागले असल्याचे दिसून येते. उदा. तो म्हणतो, "There must be a conscious observer. In my view, this observer is ourselves a spill from a giant ocean of thought that is God." (Parallel Universes - F. A. Wolf, 1990 P. 312) म्हणजे “जाणीवयुक्त ईक्षण करणारा असला पाहिजे. माझ्या मते हा ईक्षण करणारा म्हणजे प्रचंड विचार - सागररूपी ईश्वराचे बिंदू रूपी अंश असलेले आम्हीच (मानवच) आहोत.” म्हणजे आम्ही मानवच अनंत कोटी ब्रह्मांडनायक आहोत ! कारण विश्वाचे कर्ते त्याचे नायकच असतात ! (व्हीलर या शास्त्रज्ञाच्या 'विलंबाने 'निर्णय घेण्याच्या' वैज्ञानिक प्रयोगाप्रमाणे (delayed choice experiment) वर्तमानकालीन आम्ही (मानव) भूतकालात विश्वाची निर्मिती करू शकतो.

## जडवादी सिद्धांत

वर म्हटल्याप्रमाणे जडवादानुसार माणसाचे शरीर मृत्यूनंतर नष्ट झाले तरी शरीरातील जडतत्त्वे (माती वा राख रूपाने) शिल्लक राहतात; नष्ट होत नाहीत. जीव वा आत्मा मात्र नष्ट होतो ! शिल्लक राहत नाही. त्यामुळे मृतात्मा, भूत, पिशाच वगैरे गोष्टी केवळ कल्पना ठरतात. त्यांना अस्तित्व नाही. मग पुनर्जन्माविषयी बोलायलाच नको. ती एक भाकडकथा ठरते !

या जडवादाच्या उपसिद्धांतानुसार मेंदूतून मन निर्माण होते किंबहुना मेंदू म्हणजेच मन. मनाला स्वतंत्र अस्तित्व नाही. त्यामुळे मनाला ज्ञान होणे । म्हणजे मेंदूला ज्ञान होणे होय. आणि मेंदूला ज्ञान होते ते केवळ ज्ञानेंद्रियांमार्फतच. आणि पाच ज्ञानेंद्रियांनाही केवळ भौतिक माध्यमाद्वारेच ज्ञान होऊ शकते. त्यामुळे दुसऱ्याच्या मनातील विचार कळणे (telepathy) अशक्य ठरते. त्याचप्रमाणे भूत व भविष्यकाळातील घटनांचे ज्ञान होणे (retrocognition, precognition) अशक्य ठरते. दूरच्या दृष्टिआडच्या वस्तूचे ठरते. तसेच केवळ मनशक्तीने बाह्य वस्तूवर परिणाम घडवून आणणे, उदा. या घटनांचे भौतिक माध्यमाशिवाय ज्ञान होणे (clairvoyance) हेही अशक्य मन शक्तीने वस्तूत बदल करणे, हलविणे (P.K) इ. गोष्टीही अशक्य आहेत. असे ठरते. थोडक्यात ज्यांना अतीन्द्रिय घटना म्हणतात त्या सर्व अशक्य असल्याचे जडवादाचा हा उपसिद्धांत सांगतो.

पण या सर्व घटना अशक्यच नव्हे तर प्रत्यक्ष घडत असल्याबद्दलचे असंख्य पुरावे आढळून येतात. ते पुरावे प्रस्तुत लेखकाने आपल्या 'विज्ञान आणि बुद्धिवाद' व 'विज्ञान आणि चमत्कार' या ग्रंथांतून शेकड्यानी दिले आहेत. त्यांची पुनरुक्ती येथे शक्य नाही व आवश्यकही नाही. वाचकांना अशा पुराव्यांच्या स्वरूपाची कल्पना येण्यासाठी **त्या ग्रंथात न दिलेली, पण मी स्वतः प्रत्यक्ष अनुभवलेल्या अतींद्रिय घटनांची काही उदाहरणे येथे देऊ इच्छितो.** त्याचे कारण म्हणून मला प्रथम हे सांगितले पाहिजे की मी मुळात भौतिक विज्ञानवादी व बुद्धिप्रामाण्यवादी होतो. परंतु प्रत्यक्ष अनुभवाला आलेल्या अतींद्रिय घटनांमुळे माझ्या दृष्टिकोनात परिवर्तन होऊन मी अध्यात्मवादी बनलो, भौतिकवाद व बुद्धिवाद अगदीच तोकडा असल्याची मला तीव्र जाणीव झाली. जीवनात अनुभव हाच श्रेष्ठ शिक्षक आहे हे निस्संशय खरे आहे. तथापि ज्या गोष्टींचा स्वतला अनुभव येत नाही त्या सर्व गोष्टी खोट्या असतात असे म्हणता येत नाही. पण हे सुद्धा मला अनुभवानेच कळले, हे मान्य केले पाहिजे. ते कसे याचे कारण सांगणे आवश्यक आहे.

## भुतांचा शोध

लहानपणापासून भुतांच्या गोष्टी ऐकून मी भुतांचा शोध घेण्याचा इतका प्रयत्न केला, इतका हिंडलो की त्याची एक स्वतंत्र सुरस कथा होईल. पण ते विषयांतर होणार असल्याने ती कथा येथे सांगत नाही. पण प्रत्यक्ष हेच सत्याचे प्रमाण मानणाऱ्या मला एवढे प्रयत्न करूनही ज्या अर्थी प्रत्यक्ष भूत दिसत नाही किंवा त्याच्या अस्तित्वाचा साक्षात् अनुभव येत नाही, त्या अर्थी भुतांच्या सर्व गोष्टी काल्पनिकच असल्या पाहिजेत असा मी निष्कर्ष काढला, आणि तो निष्कर्ष "It is a bombastic formula that what I do not know is not knowledge " म्हणजे मला ज्याचे ज्ञान होत नाही ते ज्ञानच नव्हे किंवा मला ज्याचा अनुभव येत नाही तो अनुभवच नव्हे ही एक पोकळ वल्गना आहे" असे जे लेडबीटर या ब्रह्मविज्ञानवाद्याने म्हटले आहे त्या म्हणण्याच्या सत्यतेची मला ओळख नव्हती म्हणूनच काढला हे मान्य केले पाहिजे; आणि तो निष्कर्ष चुकीचा होता हे नंतर मला अनुभवानेच कळले. सर्वांना सर्व प्रकारचे अनुभव यावेत ही अपेक्षाच मुळी चुकीची आहे. अवास्तव आहे. पण माझ्या बाबतीत गंमत घडली ती अशी की मी ज्या भुतांचा मी ती पाहण्यासाठी अनुभवासाठी शोध घेत, हिंडत होतो, ती भुते शेवटी स्वतःहोऊन मला भेटायला माझ्या घरीच आली! पण ती कथा पुढे सांगावयाची आहे. माझे अनुभव मला कालक्रमानुसार सांगावयाचे आहेत.

## कर्णपिशाचाचा अनुभव

आश्चर्य असे की मला पहिला अनुभव आला तो पिशाचाचा ! माझी आई मोठे मोकळे झालेले रॉकेलचे डबे ज्वारीने भरून संपूर्ण वर्षासाठी ज्वारीची बेगमी करून ठेवत असे. एकदा अशा अनेक ज्वारीने भरलेल्या डब्यापैकी एक डबा नाहीसा झाला. एका डब्याची चोरी झाली. या घटनेनंतर काही दिवसानी आमच्या शेतातील तंबाखूच्या पिकाची नासाडी केलेली आढळली. पाने कापण्यात आली होती, अशाप्रकारे चोरीच्या व आमचे नुकसान करणाऱ्या घटना यापूर्वी आमच्या बाबतीत कधीच घडल्या नव्हत्या, हे कोणाचे कृत्य हे कळण्याचा काही मार्ग नव्हता. कारण आमचे कोणी शत्रू नव्हते. आम्ही कोणाचे काही वाईटही कलेले नव्हते. म्हणून हे गूढ उकलण्याची तीव्र इच्छा होती. काही दिवसांनी आम्हाला योगायोगाने समजले की कल्लोळ, (ता. चिक्कोडी, जि. बेळगाव) या कृष्णा नदीच्या काठावरील गावातील विठोबा कोळी नावाचा माणूस चोरी, खून इ. करणाऱ्या व्यक्तींची प्रत्यक्ष नावेच सांगतो. ही माहिती मिळताच मी व आई लगेच कल्लोळ या गावी गेलो. खरेतर

चोरांची नावे जाणून घेण्यापेक्षा हे कसे शक्य आहे, हे जाणण्याची मला तीव्र इच्छा होती. विठोबा कोळी सुदैवाने घरीच भेटला. त्याला घडलेल्या घटना सांगितल्या. आश्चर्य असे की प्रथम ज्वारीचा डबा नाहीसा झाल्याचे सांगताच क्षणाचाही विलंब न लावता त्याने डबा चोरलेल्या बाईचे नाव सांगतले ! आश्चर्य म्हणजे ती बाई शेजारची भाऊबंधातीलच होती व आमच्या घरी काही कामानिमित्त अधून-मधून येत होती. शेतातील तंबाखूची पाने कापलेली घटना सांगताच त्याने पाने कापलेल्या माणसाचेही

लगेच नाव सांगितले ! आश्चर्य म्हणजे तोही आमच्या भाऊबंधातीलच होता ! आमच्या शेताशेजारी असलेल्या आपल्या शेतात तो घर बांधून राहिला होता. (ही जवळची माणसे असल्यामुळे त्यांची नांवे येथे उघड करता येत नाहीत. मात्र शेतातील घरात राहणाऱ्या या व्यक्तीला वरील घटनेनंतर आमच्या शेतातील चारा चोरताना रंगेहात मी पकडले होते, हे येथे सांगितले पाहिजे.)

मी विठोबा कोळीला 'ही नावे तुला कशी कळली?' असे विचारले. तेव्हा त्याने मला 'पिशाच कानात नावे सांगतो' असे उत्तर दिले! यालाच कर्णपिशाच म्हणतात हे मला नंतर माहित झाले. विठोबाच्या या कर्णपिशाचाने सांगितलेल्या नावांची खात्री पटल्यामुळे पिशाचाचे किंवा भुतांचे अस्तित्व खोटे नाही हे मला मान्य करावे लागले ! (अन्यथा विठोबाला ती नावे कशी कळाली व तो खोटे का चोलेल? हे प्रश्न निर्माण होतात) भूत प्रत्यक्ष दिसले तरच त्याचे अस्तित्व सिद्ध होते हा आग्रह चुकीचा आहे हे मला मान्य करावे लागले. कर्णपिशाच्चाच्या या अनुभवामुळे भौतिक विज्ञानवादाच्या व बुद्धिवादाच्या मर्यादेची मला तीव्र जाणीव झाली.

## अतींद्रिय प्रत्यक्षाच्या सत्यतेचा अनुभव

या घटनेनंतर माझ्या एका नात्यातील व्यक्तीकडून मला समजले की, बेळगावच्या दक्षिणेकडे काही मैल अंतरावर असलेल्या येळूर या गावी एक लिंगायत स्वामी असून तो भूत-भविष्य अचूकपणे सांगतो. हे ऐकताच मी त्याची परीक्षा घेण्याचे ठरवून योग्य संधी येताच त्याच्याकडे गेलो. मी त्याच्यासमोर बसलो नाही तोच तो मला (कानडीतून) म्हणाला, "साहेब तुम्ही माझी परीक्षा घेण्यासाठी आला आहात हे खरे. पण मी कोणाला परीक्षा देण्यासाठी येथे बसलेलो नाही. लोकांच्या अडचणी सोडवण्यासाठी बसलो आहे." हे ऐकून मी सर्दच झालो माझ्या

विज्ञानवादाला व बुद्धिवादाला ही सलामीलाच चपराक होती! मी हे खरे असल्याचे मान्य केले, तथापि एका चोरीच्या प्रकरणाबद्दल विचारायचे आहे, म्हणून आलो आहे असे मी म्हटले. मग त्याने आपल्या हातातील नोटपॅडवर काहीतरी लिहिले व मला कोणत्याही एका फुलाचे नाव मनात धरायला सांगितले. मी धरले म्हणताच लगेच त्याने माझ्यापुढे ते नोटपॅड धरले, आश्चर्य असे की मी मनात धरलेल्या फुलाचेच नाव त्या नोट पॅडवर होते. मी ते नाव मनात धरण्यापूर्वीच त्याने ते लिहिले होते. म्हणजे मी कोणते फूल मनात धरणार आहे हे त्याला मी मनात धरण्यापूर्वीच समजलेले होते? त्याचा पुरावाच त्याने माझ्यासमोर धरला होता. माझ्या विज्ञानवादाला व बुद्धिवादाला हा दुसरा मोठा धक्का होता. नंतर तो म्हणाला, "साहेब, तुमचे ६४ रुपये चोरीला गेले आहेत." हेही बरोबर होते. चोरणाऱ्या व्यक्तीचे वर्णनही त्याने केले. ज्या माझ्या टेबलाच्या खणातून पैसे गेले होते त्या टेबलाजवळच्या खुर्चीवर ती व्यक्ती अनेकदा येऊन बसत असे. तसेच वर्णन त्या स्वामीने केले व ती व्यक्ती तुमची संबंधित असल्याचेही त्याने म्हटले. आश्चर्य म्हणजे हा पैसे चोरणारा पूर्वी आमचा ज्वारीचा डबा चोरलेल्या बाईचा मुलगा होता ! पैसे मिळणार नाहीत असेही त्याने सांगितले. हे भाकीतही नंतर खरे ठरले. त्यांनी ही विद्या तुम्ही कशी प्राप्त केली असा प्रश्न केला, तेव्हा काशीत ही विद्या मी शिकलो असून दर अमावास्येला पाण्यात बसून अनुष्ठान करावे लागते असे त्याने सांगितले. शेवटी मी त्याचा निरोप घेण्यासाठी उठणार तोच तो मला म्हणाला, "साहेब, तुम्ही एका मोठ्या व्यक्तीच्या मदतीने कॉलेज काढणार आहात". हे ऐकून मात्र मी स्तंभितच झालो. त्यावेळी मी एक साधा हायस्कूल शिक्षक होतो. कॉलेजमध्ये प्राध्यापक होण्याचेही स्वप्न नव्हते. मग कॉलेज काढण्याची गोष्टच दूर ! मी मनातल्या मनात हसलो व त्याचा निरोप घेतला. पण खरोखरच नंतर त्याचे हे भाकीत खरे ठरले ! वीस वर्षांनंतर मी खरोखरच ज्युनियर कॉलेज काढले आणि तेही कोणा सामान्य व्यक्तीच्या साह्याने नव्हे, तर खुद्द भारताच्या माजी पंतप्रधानांच्या मदतीने ! अर्थात् त्यावेळी ते पंतप्रधान नव्हते. तर कर्नाटकात प्रथमच सत्तेवर आलेल्या जनता पक्षाच्या सरकारात एक मंत्री होते - देवेगौडा ! आश्चर्य म्हणजे हे भविष्य त्या स्वामींनी माझे नाव, जन्मतारीख वगैरे काहीही माहीत नसता वर्तविले होते. अतींद्रिय दृष्टीच्या सत्यतेची खात्री अनुभवानंतर मी पूर्ण अध्यात्मवादी बनलो.

माझ्यात झालेल्या एक पूरक पण महत्त्वाचे कारण नंतर घडले. ते कारण म्हणजे अतींद्रिय घटनांची सत्यता वैज्ञानिक निकषावर पाश्चिमात्य देशात सिद्ध झाली आहे ही माहिती ! त्यावेळी मला ही गोष्ट माहीत नव्हती. प्रसिद्ध जीवशास्त्रज्ञ ज्युलियन हक्सले याने आपल्या **Evolution : The Modern Synthesis** या ग्रंथातील **Evolutionary Progress** या शेवटच्या प्रकरणात जे. बी.व्हाईन यांनी परचित्र ज्ञानावर (telepathy) संशोधन करून अशा प्रकारची माणसात असल्याचे सप्रयोग सिद्ध केले असल्याचे व्हाईनच्या Extrasensory Perception (अतींद्रिय प्रत्यक्ष) या सदर्भ देऊन म्हटले आहे. केवळ भौतिक विज्ञानाचा व भौतिकवादी शास्त्राचा अभ्यास करणाऱ्या मला ही ज्युलियन हक्सलेच्या ग्रंथातील माहिती अगदीच नवी होती. माझ्या वैयक्तिक अतींद्रिय अनुभवाच्या जोडीला अतींद्रिय घटनांच्या सत्यतेच्या प्रयोगाचे हे पाश्चिमात्य शास्त्रीय दाखले अशा रीतीने माझ्या दृष्टिकोनात संपूर्ण परिवर्तन घडवून आणण्यास कारणीभूत ठरले.[2] आश्चर्य असे की कदाचित ही

---

[2] * ज्या व्हाईन याच्या 'अतींद्रिय प्रत्यक्ष' च्या ग्रंथाचा संदर्भ जडवादी जीवशास्त्रज्ञ हक्स्लेने दिला आहे (ज्याच्या अभ्यासाने माझ्या जडवादी वैज्ञानिक दृष्टिकोनात बदल झाला) त्या ग्रंथामुळे हक्स्लेच्या जडवादी दृष्टिकोनातही बदल व्हावयास नको होता काय ? पण तो बदल झालेला नाही, नव्हे होऊ शकत नाही ही वस्तुस्थिती आहे. याचे कारण जडातून जीवाची उत्पत्ती व उत्क्रांती झाल्याचे मानणाऱ्या डार्विनवादाचा पुरस्कर्ता असलेल्या हक्सलेला जडातून जीवाबरोबर अतींद्रिय शक्तीदेखील उत्क्रांत होऊ शकते व ती जीवाची पुढील प्रगती ठरते हे स्वीकारण्यास काही तात्त्विक अडचण वाटत नाही. वाटण्याचे कारण नाही. मेंदू जडाचेच उत्क्रांत रूप मानणाऱ्या व मेंदू व मन हे वेगळे न मानणाऱ्या जडवाद्यांना मन व मनाची अतींद्रिय शक्ती यांना जड मेंदूचीच रूपे मानण्यात कसलीच अडचण वाटण्याचे कारण नाही. उदा. १९५८ साली फ्रेंच जेसुइट फादर टिलहार्द द शार्दीन याच्या "The Phenomenon of Man" (1959) या प्रसिद्ध पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेत हक्सले स्पष्टच म्हणतो “mind is generated by or in complex organisation of living matter” (p. 16-17) म्हणजे मन हे सजीव पदार्थाच्या गुंतागुंतीच्या संघटनेतून किंवा संघटनेमुळे निर्माण झाले आहे. याचा अर्थ या गुंतागुंतीच्या संघटनेविरहित



ईश्वरी योजना असेल या प्रसंगानंतर माझ्या जीवनात अतींद्रिय घटना वरचेवर घडू लागल्या ! त्या सर्व येथे सांगणे शक्य नाही. कारण त्यांचा एक ग्रंथ होईल, इतक्या त्या आहेत. नमुन्यासाठी काही निवडक घटनांचीच फक्त माहिती येथे देत आहे. आणि तेवढ्या घटनांची माहिती जडवाद कसा खोटा आहे हे दाखवून देण्यास वाचकांसाठी पुरेशा आहेत.

==============================




---

किंवा संघटनेहन वेगळे मनाला स्वतंत्र अस्तित्व नाही ! तात्पर्य, मनाच्या व पर्यायाने मनरूपी आत्म्याच्या (जिवात्म्याच्या व मृतात्म्याच्या) अस्तित्वाच्या पुराव्याकडे हे जडवादी एक तर बुद्धिपुरस्सर दुर्लक्ष करतात, म्हणजे जाणूनबुजून आंधळे बनतात किंवा ते पुरावे त्यांना माहीतच नाहीत, असाच यातून  निष्कर्ष निघतो. पुरावे माहीत नसतील तर आणि ही विज्ञानाच्या दृष्टीने अत्यंत गंभीर बाब आहे. जडवादी उत्क्रांतीचा सिद्धांत अज्ञानातून जन्मला आहे असे ठरते.